राज्य मराठी विकास संस्थेच्या संचालक या पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्ती -
श्री. सं. कृ. पाटील, राज्यकर उपआयुक्त,
राज्यकर आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई.

**महाराष्ट्र शासन**
**मराठी भाषा विभाग**
**शासन आदेश क्रमांक : रामवि-२०१९/प्र.क्र.१५७/आस्था-२**
नवीन प्रशासन भवन, ८ वा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ०७ फेब्रुवारी, २०२०

वाचा

१) **मराठी भाषा विभाग, शासन आदेश समक्रमांक, दि.०६.१२.२०१९.**
२) **श्री. सं.कृ. पाटील, राज्यकर उपआयुक्त यांचे दि.०६.०१.२०२० चे निवेदन**

**शासन आदेश -**

राज्य मराठी विकास संस्थेतील संचालक हे पद दि.१३.०३.२०१० पासून रिक्त झाले असून त्या वेळेपासून सदर पदाचे कामकाज अतिरिक्त कार्यभाराच्या माध्यमातून सुरु आहे. संदर्भ (१) नुसार या पदाचा अतिरिक्त कार्यभार श्रीमती मीनाक्षी रा. पाटील, सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ यांच्याकडे सोपविण्यात आला आहे. संदर्भ (२) नुसार प्राप्त झालेले निवेदन विचारात घेऊन राज्य मराठी विकास संस्थेतील संचालक हे पद सन २०१० पासून रिक्त असल्याने एक विशेष बाब म्हणून सदरच्या संचालक, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई या पदावर श्री. सं. कृ. पाटील, राज्यकर उपआयुक्त, राज्यकर आयुक्त कार्यालय, मुंबई यांची २ वर्षांसाठी प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात येत आहे. श्री. सं. कृ. पाटील हे ज्या दिवशी संचालक, राज्य मराठी विकास संस्था या पदावर हजर होतील त्या दिवसापासून त्यांचा प्रतिनियुक्ती कालावधी सुरु होईल. महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम १९८१

च्या नियम ४० व परिशिष्ट २ नुसार तसेच वित्त विभाग आणि सामान्य प्रशासन विभाग यांनी वेळोवेळी निर्गमित केलेल्या सूचना विचारात घेऊन प्रस्तुत प्रतिनियुक्तीच्या अटी व शर्ती तयार करण्यात आल्या असून त्या सोबतच्या परिशिष्टामध्ये दिल्या आहेत.

श्री. सं. कृ. पाटील यांनी संचालक या पदाचा कार्यभार श्रीमती मीनाक्षी रा. पाटील, सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ तथा प्रभारी संचालक, राज्य मराठी विकास संस्था यांच्याकडून घ्यावा व तसे शासनास कळवावे. श्री. सं. कृ. पाटील यांनी पदभार स्वीकारल्यानंतर श्रीमती मीनाक्षी रा. पाटील यांच्याकडील सदर पदाचा अतिरिक्त कार्यभार आपोआपच संपुष्टात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००२०७१०४५१५०७३३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Aparna Arvind Gawde

Digitally signed by Aparna Arvind Gawde
DN: CN = Aparna Arvind Gawde, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Marathi Language
Date: 2020.02.07 12:03:31 +05'30'

**(अपर्णा अ. गावडे)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१) श्री. सं. कृ. पाटील, राज्यकर उपआयुक्त, राज्यकर आयुक्त कार्यालय, माझगाव, मुंबई ४०० ०१०.

२) श्रीमती मीनाक्षी रा. पाटील, सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, प्रभादेवी, मुंबई. ४०० ०२५.

प्रत,

१) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता, मुंबई ४०० ०२०.

२) अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

३) मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

४) मा. मंत्री (मराठी भाषा) यांचे खाजगी सचिव/विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
५) मा. राज्यमंत्री (मराठी भाषा) यांचे खाजगी सचिव/विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
६) राज्यकर आयुक्त, माझगाव, मुंबई ४०० ०१०.
७) सचिव (मराठी भाषा विभाग) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
८) भाषा संचालक, भाषा संचालनालय, वांद्रे, मुंबई ४०० ०५१.
९) संचालक, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ४०० ००१.
१०) सचिव, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, प्रभादेवी, मुंबई ४०० ०२५.
११) सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, प्रभादेवी, मुंबई ४०० ०२५.
१२) सर्व अवर सचिव/कक्ष अधिकारी, मराठी भाषा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१४) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१५) निवड नस्ती.

# परिशिष्ट

**मराठी भाषा विभाग, शासन आदेश क्र. रामवि-२०१९/प्र.क्र.१५७/आस्था-२, दि. ०७ फेब्रुवारी, २०२० चे सहपत्र**

महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या कळातील प्रदान) नियम, १९८१ च्या नियम ४० मधील तरतूदीनुसार प्रतिनियुक्तीच्या अर्टी व शर्ती

--------

१) **प्रतिनियुक्तीचा कालावधी** :- श्री. सं. कृ. पाटील यांची महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ च्या नियम ४० मधील तरतुदीनुसार त्यांची प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात येईल. तसेच प्रतिनियुक्तीचा कालावधी हा रुजू झाल्यापासून दोन वर्षे इतका असेल.

अ) जर त्यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने शासनास आवश्यक वाटली तर त्यांना त्यांचा प्रतिनियुक्तीचा कालावधी पूर्ण होण्यापूर्वी स्वीयेतर सेवेतून केव्हाही परत बोलावण्याचा हक्क शासनास असेल.

ब) त्यांच्या सेवेची आवश्यकता राज्य मराठी विकास संस्था यांना नसेल तर त्यांना शासन सेवेत परत पाठविण्याची मुभा संस्थेस राहील. मात्र तत्पूर्वी किमान ३ महिने अगोदर शासनास तसे कळविणे आवश्यक राहील आणि

क) जर त्यांना आपल्या मूळ विभागाकडे परत यावयाचे असेल तर त्यांना मूळ विभागात परत येण्याची मुभा राहील. मात्र तत्पूर्वी किमान ३ महिने अगोदर शासनास तसे कळविणे आवश्यक राहील.

२) **वेतन :-** ते प्रतिनियुक्तीच्या कालावधीत “संचालक” हे पद धारण करतील. परंतु सदर कालावधीत त्यांनी त्यांच्या राज्यकर उपआयुक्त अ या मूळ-गट ,पदाची वेतन संरचना किंवा संस्थेतील संचालक या प्रतिनियुक्तीच्या पदाची वेतनसंरचना स्वीकारु शकतील. सदरची संस्था ही १००% राज्य शासन अनुदानित असल्याने त्यांना प्रतिनियुक्ती भत्ता लागू असणार नाही.

३) **महागाई भत्ता:-** राज्य शासनाकडील त्यांचे वेतनमान कायम ठेवतील किंवा स्वीयत्तर सेवेतील पदाशी संलग्न असणाऱ्या वेतनमानात वेतन घेतील. त्याप्रमाणे त्यांना राज्य शासनाकडील किंवा राज्य मराठी विकास संस्था यांच्याकडील नियमानुसार अनुज्ञेय असलेला महागाई भत्ता मिळण्याचा हक्क असेल.

४) **घरभाडे भत्ता / स्थानिक पूरक भत्ता** :- त्यांना राज्य शासनाच्या नियमांनुसार वेळोवेळी अनुज्ञेय असेल त्याप्रमाणे घरभाडे भत्ता, स्थानिक पूरक भत्ता मिळण्याचा हक्क असेल.

५) **पदग्रहण अवधी वेतन आणि बदली प्रवास भत्ता :-** स्वीयत्तर सेवेत बदली झाल्यानंतर आणि तेथून परत आल्यानंतर अशा दोन्ही वेळच्या पदग्रहण अवधीमध्ये त्यांचे वेतन व प्रवास भत्ता, राज्य शासनाच्या संबंधित नियमानुसार राज्य मराठी विकास संस्थेकडून देण्यात येतील.

६) **प्रतिनियुक्तीच्या कालावधीत कर्तव्यार्थ केलेल्या प्रवासाकरिता प्रवास भत्ता :-** स्वीयेतर सेवेत रुजू झाल्यानंतर कराव्या लागणाऱ्या प्रवासाकरिता राज्य शासनाच्या संबंधित नियमांन्वये किंवा राज्य मराठी विकास संस्थेच्या नियमान्वये प्रवास भत्ता आणि दैनिक भत्ता मिळण्याचा हक्क असेल.

७) **रजा:-** प्रतिनियुक्तीच्या कालावधीत महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ हे नियम लागू असतील. महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ च्या नियम १८ (२) मध्ये दिलेल्या कार्यपध्दतीचा काटेकोरपणे अवलंब करण्यात यावा. स्वीयेतर सेवेतून मुक्त झाल्यानंतर त्यांना परस्पर रजेवर जाण्यास राज्य मराठी विकास संस्थेने परवानगी देता कामा नये. म्हणजेच प्रथम शासकीय सेवेत रुजू होवून मूळ विभागाच्या सक्षम प्राधिकाऱ्याकडून नेहमीच्या पध्दतीने त्यांनी आपली रजा मंजूर करुन घेतली पाहिजे. स्वीयेतर सेवेच्या कालावधीत अथवा अखेरीस घेतलेल्या रजेच्या कालावधीबद्दल द्यावयाच्या रजा वेतनाचा कोणत्याही पूरक भत्त्याच्या संबंधातील संपूर्ण खर्च राज्य मराठी विकास संस्थेला सोसावा लागेल.

८) **विकलांगता रजेबद्दल रजा वेतन** :- स्वीयेतर सेवेत किंवा अशा सेवेमुळे आलेल्या विकलांगतेबद्दल मंजूर करता येईल अशा रजेच्या संबंधात, अशी विकलांगता स्वीयेतर सेवा संपल्यानंतर उघडकीस आली तरीसुध्दा रजावेतन देण्यास राज्य मराठी विकास संस्था जबाबदार असेल. अशा रजा वेतनाचा खर्च राज्य मराठी विकास संस्थेकडून वसूल करण्यात येईल.

९) **रजा वेतन आणि निवृत्तीवेतन अंशदान :-** सदरची संस्था १००% राज्य शासन अनुदानित असल्याने रजा वेतन व निवृत्ती वेतन अशंदान संस्थेने शासनाकडे जमा करण्याची आवश्यकता नसेल.

१०) **रजा मुदती प्रवास सवलत** :- त्यांना राज्य शासनाच्या संबंधित नियमातील तरतूदीनुसार रजामुदती प्रवास सवलत मिळण्याचा हक्क असेल. या संबंधातील खर्च राज्य मराठी विकास संस्थेस सोसावा लागेल.

११) **वैद्यकीय सवलती** :-त्यांना महाराष्ट्र नागरी सेवा (वैद्यकीय उपचार) नियम, १९६१ अनुसार अनुज्ञेय असणाऱ्या वैद्यकीय सुविधांपेक्षा कमी प्रतीच्या नसतील अशा सुविधा मिळण्याचा हक्क असेल आणि त्यावरील खर्च राज्य मराठी विकास संस्थेला सोसावा लागेल.

१२) **सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधीची वर्गणी** :- स्वीयेत्तर सेवेतील राज्य शासकीय कर्मचाऱ्यांच्या भविष्य निर्वाह निधी खात्यात जमा करावयाच्या सर्व रक्कमा संस्थेने भविष्य निर्वाह निधी लेखांकनासाठी विहित केलेल्या परिपूर्ण अनुसूचीसह थेट महालेखापाल १/२, मुंबई/नागपूर यांच्या कार्यालयात रेखांकित धनाकर्षाद्वारे अथवा स्थानिक रेखांकित धनादेशाद्वारे जमा करावी.

वरील कार्यपध्दतीचा अवलंब न करता अशा रक्कमा चलनाद्वारे बँकेत (कोषागाराशी निगडीत बँक) भरणा केल्यास चलनावर खातेदाराचा संपूर्ण तपशील नमूद करावा. त्याचप्रमाणे चलनासोबत सर्व तपशील भरलेली भविष्य निर्वाह निधी खात्याच्या लेखांकनास विहित केलेली अनुसूची जोडण्याची दक्षता घ्यावी. ह्या तपशीलाअभावी रकमा खातेदाराच्या खात्यात उशिराने जमा झाल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित कार्यालयाची तसेच संबंधित कर्मचाऱ्याची राहील.

प्रतिनियुक्तीच्या कालावधीत त्यांना त्यांच्या भविष्य निर्वाह निधी खात्यातून परतावा / ना-परतावा अग्रिम मंजूर करण्यास शासन )वित्त विभाग( सक्षम असल्यामुळे याबाबतचे अर्ज वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई यांच्याकडे मंजुरीसाठी पाठविण्यात यावेत.

१३) **विभागीय चौकशी :-** त्यांच्याविरुध्द विभागीय चौकशी सुरु करावयाची असेल तर त्यांना, त्यांच्या मूळ विभागाकडे परत पाठविण्यात येईल. शासन त्यांना निर्वाह भत्ता देईल परंतु तो राज्य मराठी विकास संस्थेकडून वसूल करण्यात येईल.

१४) **बोनस/सानुग्रह प्रदान** :- त्यांना बोनस किंवा सानुग्रह प्रदान अनुज्ञेय नाही. तथापि, राज्य मराठी विकास संस्थेमध्ये बोनस किंवा सानुग्रह प्रदान जाहीर करण्यात येत असल्यास (त्यांच्यावर बोनस देण्याचे कायदेशीर बंधन नसले तरीही) संस्थेने जाहीर केलेले सानुग्रह प्रदान स्वीकारण्यास त्यांना परवानगी देता येईल.

१५) **गट विमा योजना**:- त्यांच्या वेतनातून राज्य शासकीय कर्मचारी गट विमा योजनेच्या वर्गणीपोटी राज्य मराठी विकास संस्था दरमहा वसूल करील आणि ही रक्कम धनादेशाद्वारे महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई यांच्याकडे पाठवेल. सदर रक्कम "८०११-विमा व निवृत्ती वेतन निधी इतर विमा व निवृत्तीवेतन निधी राज्य शासकीय कर्मचाऱ्यांची गट विमा योजना(८०११००५९५)" या लेखाशीर्षाखाली जमा दर्शविण्यात यावी. सदर वर्गणी भरण्यास विलंब करण्यात आल्यास विलंब कालावधीत दंडनीय दराने व्याज आकारण्यात येईल.

१६) **कर्ज आणि अग्रिम**:- प्रतिनियुक्तीच्या कालावधीत, भविष्य निर्वाह निधी परतावा/प्राप्त/ना-परतावा अग्रिम, घरबांधणी अग्रिम, मोटारकार अग्रिम, वैयक्तिक संगणक अग्रिम मंजूर करण्यास शासन सक्षम असेल. याबाबतचे त्यांचे अर्ज त्यांच्या मूळ विभागाकडे मंजुरीसाठी पाठविण्यात यावेत. राज्य मराठी विकास संस्थेने त्यांना सदर अग्रिम मंजूर करु नये.

१७) **प्रतिनियुक्तीवर असताना रजेवरुन अथवा प्रशिक्षणावरुन परत आल्यानंतर नियुक्ती** :- त्यांच्या प्रतिनियुक्तीच्या कालावधीत रजेवर गेल्यास किंवा प्रशिक्षणासाठी गेल्यास आणि ते धारण करीत असलेल्या पदावर अन्य अधिकाऱ्यांची नियुक्ती करण्यात आली आणि रजेवरुन अथवा प्रशिक्षणावरुन परत आल्यानंतर त्यांची नियुक्ती अन्य पदावर करण्यात आली तर रजा वेतन, वेतन, पदग्रहण अवधी, सक्तीचा खोळंबा कालावधी, इत्यादीबाबत सर्व खर्च रजा समाप्तीच्या अथवा प्रशिक्षण समाप्तीच्या दिनांकापासून ते अन्य पदाचा कार्यभार धारण करणे या दिनांकापर्यंत राज्य मराठी विकास संस्थेला सोसावा लागेल.

१८) **प्रतिनियुक्ती कालावधीत देशात/परदेशात प्रवास** :- राज्य मराठी विकास संस्था यांच्याकडे प्रतिनियुक्तीवर असताना सदर संस्थेच्या कामासंबंधात देशात कोठेही प्रवास करावयाचा झाल्यास शासनाच्या पूर्वपरवानगीची आवश्यकता असणार नाही. मात्र, संस्थेच्या कामाच्या संबंधात परदेशी जावयाचे असल्यास, शासनाची पूर्वपरवानगी आवश्यक असेल. त्याचप्रमाणे राज्य मराठी विकास संस्थेशी प्रत्यक्ष संबंध नसलेल्या शासकीय, निमशासकीय कामानिमित्त अथवा खाजगी संस्थांच्या समारंभासाठी देशांतर्गत प्रवास करावयाचा असल्यास त्यासाठी शासनाची पूर्वपरवानगी घेणे आवश्यक राहील.

१९) **बढती** :- प्रतिनियुक्तीवर असताना त्यांची मूळ विभागात बढती होण्याची वेळ आली असेल तर सर्वसाधारणपणे त्यांची प्रतिनियुक्ती पुढे चालू ठेवू नये. तथापि सक्षम प्राधिकाऱ्याने त्यांची प्रतिनियुक्ती पुढे चालू ठेवली तर, त्यांना निकट-निम्नता नियमानुसार बढतीच्या पदाचे वेतन मंजूर केले जाईल आणि निकट निम्नता नियमाचा लाभ सहा महिन्यानंतर अनुज्ञेय असणार नाही.

२०) **कायमचे समावेशन** :- जर मागाहून त्यांची राज्य मराठी विकास संस्थेच्या सेवेमध्ये सामावून घेतले जाण्याची इच्छा असेल व अशा प्रस्तावास शासनाची मान्यता मिळाल्यास, त्यांना सामावून घेतले जाईल त्या दिनांकापासून ते शासकीय सेवेतून निवृत्त झाल्याचे मानले जाईल.

२१) **शासनाने वेळोवेळी विहीत केलेले नियम लागू करणे** :- त्यांना प्रतिनियुक्तीच्या कालावधीत शासन वेळोवेळी जे नियम करील किंवा जे कार्यकारी आदेश निर्गमित करील ते नियम कार्यकारी आदेश यथास्थिती लागू असतील.